**औसा नगरपरिषदेतील गांवठाण (जमालनगर) तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी नगरपरिषदेकडून राबविण्यात येणा-या प्रकल्पातील कामांच्या खर्चास प्रशासकीय मान्यता व निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१३/प्र.क्र.८६/तां.क.३**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ जुलै, २०१७

वाचा -

१) पर्यावरण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय,दिनांक: ३० मार्च, २०१४.
२) दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५ रोजीच्या सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) पर्यावरण विभागाचे पत्र क्र. रासयो २०१३/प्र.क्र.८६/तां.क-३, दिनांक २६.३.२०१५.
४) मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांचे पत्र क्र. जावक क्र.नपऔ/बांधकाम/२६३/२०१५, दिनांक १०.२.२०१६
५) मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांचे पत्र क्र. जावक क्र.नपऔ/बांधकाम/३९२/२०१६, दिनांक २.०३.२०१६.
६) मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांचे पत्र क्र. जावक क्र.नपऔ/बांधकाम/१०७८/२०१६, दिनांक २३.९.२०१६
७) मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांचे पत्र क्र. जावक क्र.२०१६/२४८, दिनांक ११.११.२०१६.
८) मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांचे पत्र क्र. जावक क्र.नपऔ/बांधकाम/१०७८/२०१६, दिनांक ११.१.२०१७
९) मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांचे पत्र क्र. जावक क्र.नपऔ/बांधकाम/८०/२०१७, दिनांक ७.२.२०१७.

प्रस्तावना -

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत औसा नगरपरिषद, जिल्हा लातूर यांचेमार्फत प्राप्त गावठाण (जमालनगर) तलावाच्या पर्यावरणीय संवर्धन प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.उपरोक्त तलावाच्या संवर्धनाच्या अनुषंगाने मंजूर करण्यात आलेली कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे एकूण रुपये १५०.०० लक्ष एवढी रक्कम मुक्त करण्यात आली आहे. सदर रक्कमेचा पूर्णपणे विनियोग झाल्याबाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र, बँक पासबुकाची सत्यप्रत, त्रयस्थ पाहणी अहवाल, पाण्याचा गुणवत्ता अहवाल, कामाचा भौतिक व वित्तीय प्रगती अहवाल तसेच सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त औसा नगरपरिषदेने सादर केले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने औसा नगरपरिषद हद्दीतील जमालनगर तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी झालेल्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची तसेच उर्वरित निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. राज्य योजनेखाली राज्य सरोवर योजनेंतर्गत औसा नगरपरिषदेमार्फत सादर गावठाण (जमालनगर) तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २०१४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे राज्य हिश्श्यापोटी एकूण रुपये २,५२,२३,४००/-(रुपये दोन कोटी बावन्न लक्ष तेवीस हजार चारशे फक्त) इतक्या रक्कमेस संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. उक्त नमूद प्रस्तावनेतील बाब लक्षात घेता औसा येथील जमालनगर तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता एकूण रुपये ५०.०० लक्ष (अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत औसा नगरपरिषद हददीतील गावठाण (जमालनगर) तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्श्यापोटी देय एकूण रुपये २,५२,२३,४००/- (रुपये दोन कोटी बावन्न लक्ष तेवीस हजार चारशे फक्त) एवढया रक्कमेपैकी या शासन निर्णयाव्दारे पुढील हप्ता रुपये ५०.०० लक्ष ( रुपये पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे

३. यासाठी मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद, लातूर ( Chief Officer Ausa Municipal Council) यांचे नांवे रुपये ५०.०० लक्ष ( रुपये पन्नास लक्ष फक्त ) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. औसा नगरपरिषदेला अदा करावयाची रुपये ५०.०० लक्ष एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्याधिकारी, औसा नगररिषद यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. वि. गो. कडू, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म.बा. हजारी, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद यांना रुपये ५०.०० (रुपये पन्नास लक्ष फक्त ) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाव्दारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२),पर्यावरण प्रतिबंधक (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५०१८२), ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वर्षात अर्थसंकल्पित रु.९००.०० लक्षच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.१६ मधील परिच्छेद क्रमांक ७(क) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, उपरोक्त परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असून अनुक्रमांक १,२,५,६,७,८ करिता वित्त विभाग व नियोजन विभाग यांच्या मंजुरीची आवश्यकता नाही

७. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३८/१४/व्यय-१६, दिनांक २८ मार्च, २०१४ अन्वये तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्रक्र. ८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील परि. क्र.७(क) अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २०.४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील प्रत्येक अटीची तसेच परिशिष्टातील अनु.क्र.३ व ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे.

८. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ अन्वये खालील बाबींची पुर्तता होत आहे.

१. विभागास प्रदान वित्तीय अधिकार, सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आलेली आहे.
२. जमालनगर तलावाच्या संवर्धनासाठी एकूण रुपये २,५२,२३,४००/- (रुपये दोन कोटी बावन्न लक्ष तेवीस हजार चारशे फक्त ) शासनामार्फत उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी रुपये १,५०,००,०००/-(रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त एवढा निधी खर्च झाला असून निधीचा पुढील हप्ता रुपये ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

३. मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४. मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२),पर्यावरण प्रतिबंधक (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५०१८२), ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य- लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५. औसा नगरपरिषदेकडून शासनास कोणतेही येणे बाकी नाही.

६. तसेच परिच्छेदातील ६, ७, ८, ९ या बाबी लागू नाहीत.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१५१५३२१७४५०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Vinayak G Kadoo

Digitally signed by Vinayak G Kadoo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92d45ee51f2a551db32f5e6056b22f84b99bcf4c38f0bae7d3cdb71a716490ad, cn=Vinayak G Kadoo
Date: 2017.07.15 15:54:34 +05'30'

**( वि. गो. कडू )**
**कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. मुख्याधिकारी, औसा नगरपरिषद.
५. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, लातूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
११. प्रधानसचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१४. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती.